**अतिवृष्टी/पुरामुळे बाधित होऊन पुनर्वसित झालेल्या मौजे भानेगाव ता. हदगाव जि. नांदेड येथील नागरी सुविधा कामांसाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: एलएफडी-२०२४/प्र.क्र. ५४/र-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: ०३ मार्च, २०२५

वाचा -

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एफएलडी-२०२२/प्र.क्र. १३०/र-१२, दि. ०२.११.२०२३

२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर जि. नांदेड यांचे पत्र जा.क्र: काअ/२०२३-२४/३३५०, दि. २७.०६.२०२४

**प्रस्तावना-**

सन १९८३ मधील अतिवृष्टी/पुरामुळे बाधित होऊन पुनर्वसित झालेल्या मौजे भानेगाव ता. हदगाव जि. नांदेड या पुनर्वसित गावठाणातील नागरी सुविधा कामास संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या कामाचे देयक अदा करण्यासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर जि. नांदेड यांनी संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रान्वये निधी मागणी प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. त्यानुसार प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामाकरिता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सन १९८३ मधील अतिवृष्टी/पुरामुळे बाधित होऊन पुनर्वसित झालेल्या मौजे भानेगाव ता. हदगाव जि. नांदेड या पुनर्वसित गावठाणातील "समाजमंदिर/सभागृह" या कामाचे देयक अदा करण्याकरिता एकूण रूपये १,३४,००,०००/- (अक्षरी रूपये एक कोटी चौतीस लक्ष फक्त) एवढा निधी सन २०२४-२०२५ या चालु वित्तीय वर्षात वितरित करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार मौजे भानेगाव ता. हदगाव जि. नांदेड या पुनर्वसित गावातील पुढील तक्त्यात नमूद पूर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांकरिता रूपये १,३४,००,०००/- (अक्षरी रूपये एक कोटी चौतीस लक्ष फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी- ६, २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०२, पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त

खर्च, (९२) (०४) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड यांना खालील अटींच्या अधीन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

(रक्कम रूपयात)

| अ. क्र. | पुनर्वसित गावठाण | नागरी सुविधा कामांचा तपशील | प्रशासकीय मान्यता रक्कम | यापूर्वी वितरित एकूण निधी | वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | भानेगाव | समाजमंदिर/सभागृह | २,६८,००,०००/- | निरंक | १,३४,००,०००/- |
| | | **एकूण** | | | **१,३४,००,०००/-** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची/अटींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तद्नुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर तसेच जिल्हाधिकारी, नांदेड यांना सत्वर सादर करावा.

३) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

५) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

८) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip

सह शासनास न चुकता सादर करावीत.

९) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate) महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१०) या संदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२४-२०२५ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

११) सदर निधी विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांना BEAMS प्रणालीवर तातडीने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही महसूल व वन विभागाच्या म-११ कार्यासनाने करावी.

३. सदर आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनिमय, भाग-२, दि. १७.०४.२०१५ मधील वित्तीय नियमावली भाग पहिला उपविभाग तीन परिच्छेद क्र. २७ (२) अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार व वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र. ३१८/२०२४/व्यय-९, दि. ०५.०८.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३०३१२३३२४१४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2025.03.03 12:34:09 +05'30'

**( सं. मा. जगताप )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर

२) उप आयुक्त (पुनर्वसन), छत्रपती संभाजीनगर

३) जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, नांदेड

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)

६) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)

७) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड

८) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड

९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर जि. नांदेड

१०) वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.

११) नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.

१२) महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२

१३) महसूल व वन विभाग, पी.ए.सी.कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.

14) निवडनस्ती कार्यासन र-१२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२